सन २०२० च्या खरीप हंगामामध्ये राज्यातील
तालुक्यांमध्ये दुष्काळ घोषित करणेबाबत ....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एससीवाय-२०२०/प्र.क्र.६८/म-७,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २९ ऑक्टोबर, २०२०

<u>वाचा:</u>- १) शासन निर्णय, क्रमांक: संकिर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/२०१७/म-७, दि. ०७ ऑक्टोबर, २०१७
२) शासन निर्णय, क्रमांक: संकिर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/२०१७/म-७, दि. २८ जून, २०१८
३) शासन पत्र क्रमांक: एससीवाय-२०२०/प्र.क्र.६८/म-७, दि. २० ऑक्टोबर, २०२०
४) आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्रमांक जा. क्र.कृआ/नेसआ/ख.दुष्काळ/ ३-९७७४/२०२०, दिनांक २७ ऑक्टोबर, २०२० चे पत्र

**<u>प्रस्तावना :</u>**

दुष्काळ व्यवस्थापन संहिता २०१६ नुसार जिल्हातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ व २ अन्वये सविस्तर कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. संदर्भाधीन शासन निर्णय व दुष्काळ व्यवस्थापन संहितेमध्ये विहित केलेल्या निकषानुसार खरीप २०२० च्या हंगामातील परिस्थितीच्या आधारे राज्यातील ७ तालुक्यांमध्ये दुष्काळाची दुसरी कळ लागू झाली. दुष्काळाची दुसरी कळ लागू झालेल्या ७ तालुक्यांपैकी उल्हासनगर या तालुक्यात पेरणीचे क्षेत्र निरंक असल्याने सदर तालुक्यात दुष्काळ घोषित करण्याचा प्रश्न उदभवत नाही. उर्वरित ६ तालुक्यांमध्ये प्रत्यक्ष पिकांचे नुकसानीचे सर्वेक्षण (Ground Truthing) करण्यात आले असून त्या आधारे राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार राज्यातील तालुक्यांमध्ये दुष्काळ घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

राज्यातील तालुक्यांमध्ये जून ते सप्टेंबर या कालावधीतील पर्जन्याची तूट, उपलब्ध असलेल्या भूजलाची कमतरता, दूरसंवेदन विषयक निकष, वनस्पती निर्देशांक, मृदू आर्द्रता, पेरणीखालील क्षेत्र व पीकांची स्थिती या सर्व घटकांचा एकत्रित विचार करून या घटकांनी प्रभावित झालेल्या तालुक्यामध्ये आपत्तीची शक्यता विचारात घेवून राज्य शासन गडचिरोली जिल्ह्यातील कोरची या तालुक्यामध्ये मध्यम स्वरुपाचा दुष्काळ जाहीर करीत आहे.

२. दुष्काळ घोषित करण्यात येत असलेल्या कोरची तालुक्यामध्ये खालील सवलती लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :

१) जमीन महसूलात सूट.
२) पिक कर्जाचे पुनर्गठन.
३) शेतीशी निगडीत कर्जाच्या वसूलीस स्थगिती.
४) कृषी पंपाच्या चालू विजबिलात ३३.५% सूट.
५) शालेय/महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परिक्षा शुल्कात माफी.
६) रोहयो अंतर्गत कामाच्या निकषात काही प्रमाणात शिथिलता.
७) आवश्यक तेथे पिण्याचे पाणी पुरविण्यासाठी टँकर्सचा वापर.
८) टंचाई जाहीर केलेल्या गावात शेतकऱ्यांच्या शेतीच्या पंपाची वीज जोडणी खंडीत न करणे.

३. या आदेशान्वये देण्यात येणाऱ्या विविध सवलतीपोटीचा आर्थिक भार संबंधित प्रशासकीय विभागांनी उचलावा व त्यासाठी आवश्यक निधी उपलब्ध करून द्यावा. त्यानुसार या प्रकरणी पुढील उचित कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल या विभागास सादर करण्यात यावा.

४. सदर तालुक्यातील खातेदारांना कृषी विषयक मदतीसाठी निविष्ठा अनुदान अनुज्ञेय राहील. सदर निविष्ठा अनुदान हे कोरडवाहू पिक उत्पादित केलेल्या व ३३ टक्केपेक्षा जास्त नुकसान झालेल्या खातेदारांना अनुज्ञेय राहील. निविष्ठा अनुदान देण्यासाठी लाभार्थ्यांची निवड करताना शासन निर्णय दिनांक ०३.११.२०१५ मधील परिच्छेद क्रमांक १४ मध्ये विहित केलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी. निविष्ठा अनुदानाचे दर व इतर अटी व शर्ती या शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३ मे, २०१५ मध्ये नमूद केल्यानुसार राहतील. तसेच निविष्ठा अनुदान हे नुकसान झालेल्या प्रत्यक्ष पीक पेरणी केलेल्या क्षेत्रापुरतेच मर्यादित राहील याची दक्षता घ्यावी.

५. सदर मदतीचे वाटप सन २०२० च्या खरीप हंगामातील ७/१२ मधील पिकांच्या नोंदीच्या आधारे करण्यात यावे.

६. हंगामातील अंतिम पैसेवारीसाठी करण्यात आलेल्या पिक कापणी प्रयोगाअंती आलेल्या पिक निहाय पैसेवारीच्या आधारे कोरडवाहू पीकांचे ३३ टक्के नुकसान ठरविण्यात यावे. प्रमुख पिक नसलेल्या व पिक कापणी प्रयोग न केलेल्या कोरडवाहू पिकांना सुध्दा मदत अनुज्ञेय राहील.

७. बहुवार्षिक फळपिके व बागायती पिके यांचे ३३ टक्केपेक्षा जास्त नुकसान झाल्याची शहानिशा शेतीनिहाय पंचनामे करून करण्यात यावी.

८. बहुवार्षिक फळपिके व बागायती पिकांचे नुकसान ठरविण्याचा निकष ७/१२ मधील नोंद हा असेल. नुकसानीची तीव्रता ठरविण्यासाठी पंचनामा हा निकष असेल. बहुवार्षिक फळपिके व बागायती पिकांचे नुकसान ठरविण्यासाठी त्याची नोंद ७/१२ मध्ये असणे आवश्यक आहे.

९. सन २०२० च्या खरीप हंगामातील पिक पाहणी मधील पिकांच्या ७/१२ मधील उताऱ्यातील नोंदीबाबत कोणताही आक्षेप उद्भवल्यास त्याचे निराकरण महाराष्ट्र जमीन महसूल संहितेमधील तरतूदीनुसार करण्यात यावे.

१०. दुष्काळ घोषित करण्यात आलेल्या तालुक्यामधील शाळांमध्ये मध्यान्ह भोजन योजना दिर्घ सुट्टीच्या कालावधीत देखील राबविण्यात यावी. तसेच मध्यान्ह भोजन योजना व एकात्मिक बालविकास योजनेतंर्गत ( ICDS ) मुलांना पौष्टीक अन्न देण्यात यावे.

११. सदरहू आदेश हे प्रशासकीय मान्यतेचे असून निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

१२. दुष्काळ घोषित केल्याचे आदेश दिनांक १ डिसेंबर २०२० पासून अंमलात येतील व शासनाने हे आदेश रद्द न केल्यास पुढील ६ महिन्यांच्या कालावधी पर्यंत लागू राहतील. संबंधित जिल्हाधिकारी यांनी या आदेशास जिल्हयामध्ये प्रसिध्दी द्यावी. तसेच संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना दुष्काळ घोषित

केलेल्या तालुक्यामध्ये आवश्यक उपाययोजना अंमलात आणण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी तातडीने आवश्यक उपाययोजना अंमलात आणाव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२९१७०४३३८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4ff833138266ff48bcce68d19355e87b5ab50f9e57d2ebc190012090962720dc, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.10.29 17:08:17 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. लोकसभा सदस्य/राज्यसभा सदस्य (महाराष्ट्रातील)
५) सर्व मा. विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य,
६) मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
७) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय,मुंबई,
८) अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (मदत व पुनर्वसन), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव ( महसुल ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव ( पाणी पुरवठा व स्वच्छता ), पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव ( उद्योग, ऊर्जा व कामगार ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव ( सहकार ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) प्रधान सचिव ( जलसंपदा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) सचिव ( मृदु व जलसंधारण ), मृदु व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुबई
१७) आयुक्त (कृषी) , कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१८) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१९) महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२०) सर्व विभागीय आयुक्त,
२१) सर्व जिल्हाधिकारी
२२) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
२३) वित्त विभाग (व्यय-९/ अर्थसंकल्प/अर्थोपाय ), मंत्रालय, मुंबई.

२४) सर्व सहसचिव/उपसचिव, कृषी व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई,

२५) सह सचिव तथा वित्तिय सल्लागार, मदत व पुनर्वसन, नवीन प्रशासन इमारत, मंत्रालय, मुंबई.

२६) महसूल व वन विभाग, कार्यासन क्रमांक म-३/म-११

२७) निवडनस्ती (कार्यासन म-७).